साकताक न.202112201710596101

## वित्तीय मान्यता

## शेतकरी जनता अपघात विमा योजना २०१४-१५

**महाराष्ट्र शासन**
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक - शेअवि-२०१४/प्र.क्र.६९/११-अे
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
**दिनांक - ३० ऑक्टोबर, २०१४**

**वाचा:-** १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. एनएआयएस १२०४/प्र.क्र.१६६/११-अे, दि. १९ ऑगस्ट२००४,
२)शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्र. एनएआयएस १२०४/प्र.क्र.१६६/११-अे, दि. ५ जानेवारी, २००५
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२००७/प्र.क्र.२३२/११-अे, दि. १३ जुलै, २००७
४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२००९/प्र.क्र.२६८/११-अे, दि. ४ डिसेंबर, २००९
५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२०१०/प्र.क्र.१७२/११-अे, दि. १० ऑगस्ट, २०१०
६) शासन शुद्धीपत्र, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२००९/प्र.क्र.२६८/११-अे, दि. ५ मार्च, २०११
७) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.शेअवि-२०१३/प्र.क्र.११८/११-अे, दि. ३१ ऑक्टोबर, २०१३
८) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२०१४/प्र.क्र.६९/११-अे, दि. २७ ऑक्टोबर, २०१४
९) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२०१४/प्र.क्र.६९/११-अे, दि. ३० ऑक्टोबर, २०१४

**प्रस्तावना :-**

शेती व्यवसाय करताना होणारे अपघात, वीज पडणे, पूर, सर्पदंश, विंचूदंश, विजेचा शॉक बसणे इ. नैसर्गिक आपत्तीमुळे होणारे अपघात, रस्त्यावरील अपघात, वाहन अपघात तसेच अन्य कोणत्याही कारणांमुळे होणारे अपघात यामुळे बऱ्याच शेतकऱ्यांचा मृत्यू ओढवतो किंवा काहींना अपंगत्व येते. घरातील कर्त्या व्यक्तिस झालेल्या अपघातामुळे कुटुंबाचे उत्पन्नाचे साधन बंद होवून अडचणीची परिस्थिती निर्माण होते. अशा अपघातग्रस्त शेतकऱ्यांस/त्यांच्या कुटुंबास आर्थिक लाभ देण्याकरिता कोणतीही स्वतंत्र विमा योजना नसल्यामुळे शासनाने राज्यात शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना कार्यान्वित केलेली आहे. सन २००९-१० पासून सदर योजनेचे नामाभिधान **शेतकरी जनता अपघात विमा योजना** असे करण्यात आले आहे.

सदर योजनेचे कल्याणकारी स्वरुप विचारात घेऊन ही योजना सन २०१४-१५ मध्येही चालू ठेवण्यास दि.३०.१०.२०१४ च्या शासननिर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात आली आहे.

उपरोक्त योजनेच्या अंमलबजावणीकरिता विमा कंपनीच्या नियुक्तीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त दि. १३ जुलै, २००७ च्या शासन निर्णयान्वये प्रधान सचिव (कृषि) यांच्या अध्यक्षतेखाली विमा हप्ता दर निश्चित करणे व विमा कंपन्यांची नियुक्ती करण्यासाठी समिती गठीत करण्यात आलेली आहे. सन २०१४-१५ मध्ये शेतकरी जनता अपघात विमा योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता विमा कंपन्यांची नियुक्ती करण्याकरिता व विमा हप्ता दर ठरविण्याकरिता अप्पर मुख्य सचिव (कृषि) यांच्या अध्यक्षतेखाली दि.२३.९.२०१४ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीच्या वेळी सन २०१४-१५ या वर्षाकरिता प्रति शेतकरी खालीलप्रमाणे विभागनिहाय विमा हप्ता दर विमा कंपन्यांनी मान्य केला असल्याने सन २०१४-१५ या वर्षाकरिता खालील तक्त्यात नमूद कंपन्यांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या विभागाकरिता त्यासमोर दर्शविलेल्या दराने नियुक्ती करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

| अ.क्र. | कंपनीचे नाव | विभाग | विमा हप्ता दर प्रति शेतकरी |
|---|---|---|---|
| १ | **लिबर्टी व्हिडिओकॉन** | कोकण | रु.९.०० |
| | | नाशिक | रु.११.०० |
| | | पुणे | रु.११.०० |
| २ | **टाटा अे.आय.जी.** | औरंगाबाद | रु.११.९५ |
| | | अमरावती | रु.११.९५ |
| | | नागपूर | रु.११.९५ |

२. वरील पार्श्वभूमिवर सन २०१४-१५ मध्ये दि. १ नोव्हेंबर,२०१४ ते दि. ३१ऑक्टोबर, २०१५ या कालावधीकरिता राज्यातील सर्व नोंदणीकृत शेतकऱ्यांना अपघातांपासून संरक्षण देण्यासाठी विमा कंपन्या, त्यांचेकडे सोपविण्यात आलेले विभाग व विमा संरक्षित शेतकरी संख्या लक्षात घेता विमा सल्लागार कंपन्यांना विमा कंपनीद्वारे द्यावयाच्या २.५ टक्के ब्रोकरेजसह विमा कंपन्यांना अदा करावयाची विमा हप्ता रक्कम खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | विमा कंपनीचे नाव | सोपविण्यात आलेला विभाग | शेतकरी संख्या | ब्रोकरेजसह विमा हप्ता रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | लिबर्टी व्हिडिओकॉन जनरल इन्शुरन्स कंपनी लि. सिटी टॉवर, ऑफिस नं.६०१/६०२, ६ वा मजला, बोट क्लब रोड, बंडगार्डन, पुणे ०१ | कोकण | १३२३६८१ | १२३१०९५७ |
| २ | लिबर्टी व्हिडिओकॉन जनरल इन्शुरन्स कंपनी लि. सिटी टॉवर, ऑफिस नं.६०१/६०२, ६ वा मजला, बोट क्लब रोड, बंडगार्डन, पुणे ०१ | नाशिक | २४२०५११ | २७२९११२६२ |
| ३ | लिबर्टी व्हिडिओकॉन जनरल इन्शुरन्स कंपनी लि. सिटी टॉवर, ऑफिस नं.६०१/६०२, ६ वा मजला, बोट क्लब रोड, बंडगार्डन, पुणे ०१ | पुणे | ३४५०३७२ | ३८९०२९४४ |
| ४ | टाटा एआयजी जनरल इन्शुरन्स कंपनी लि. अे ५०१, पाचवा मजला, इमारत क्रमांक ४, इन्फीनिटी पार्क, दिडोंशी, मालाड (पुर्व) ,मुंबई ९७ | औरंगाबाद | ३४८०७०२ | ४२६३४२४९ |
| ५ | टाटा एआयजी जनरल इन्शुरन्स कंपनी लि. अे ५०१, पाचवा मजला, इमारत क्रमांक ४, इन्फीनिटी पार्क, दिडोंशी, मालाड (पुर्व) , मुंबई ९७ | अमरावती | १६६३४०७ | २०३७४६५७ |
| ६ | टाटा एआयजी जनरल इन्शुरन्स कंपनी लि. अे ५०१, पाचवा मजला, इमारत क्रमांक ४, इन्फीनिटी पार्क, दिडोंशी, मालाड (पुर्व) ,मुंबई ९७ | नागपूर | १३६०२९२ | १६६६१८७६ |
| | एकूण | | १,३६,९८,९६५ | १५,८०,७५,९४५ |

३. प्रस्तुत शासननिर्णयाव्दारे नियुक्त करण्यात येत असलेल्या विमा कंपन्यांची दि. १ नोव्हेंबर,२०१४ ते दि. ३१ऑक्टोबर, २०१५ या कालावधीकरिता नियुक्ती करण्यात येत असून विमा सल्लागार कंपन्यांच्या नियुक्तीबाबत दि.२७.१०.२०१४ रोजी स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. वरील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे दि.१.११.२०१४ ते दि.३१.१०.२०१५ या कालावधीकरिता होणारी एकूण विमा हप्ता रक्कम रु.१५,८०,७५,९४५/- (रू. पंधरा कोटी ऐंशी लाख पंच्याहत्तर हजार नऊशे पंचेचाळिस फक्त) याद्वारे मंजूर करुन वितरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. विमा प्रस्ताव विहित कागदपत्रांसह ज्या दिनांकास तालुका कृषि अधिकारी यांचे कार्यालयात दाखल / प्राप्त होईल त्या दिनांकासच तो विमा कंपनीस प्राप्त झालेला आहे असे समजण्यात येईल.

५. विमा प्रस्ताव विहित कागदपत्रांसह योजनेच्या कालावधीत कधीही प्राप्त झाला तरी तो विचारात घेणे तसेच योजनेच्या अखेरच्या दिवसात झालेल्या अपघातांसाठी योजनेचा चालू वर्षाचा मंजूर कालावधी संपल्यानंतर ९० दिवसांपर्यंत तालुका कृषि अधिकाऱ्यांकडे प्राप्त झालेले प्रस्ताव स्विकारणे विमा कंपनीवर बंधनकारक राहील शिवाय समर्थनीय कारणांसह ९० दिवसांनंतर प्राप्त होणारे विमा प्रस्ताव स्विकारणे विमा कंपनीवर बंधनकारक राहील. प्रस्ताव विहित मुदतीत सादर केले नाहीत या कारणास्तव विमा कंपन्यांना विमा प्रस्ताव नाकारता येणार नाहीत.

६. विमा कंपन्यांना सुस्पष्ट कारणांशिवाय विमा प्रस्ताव नाकारता येणार नाहीत. विमा कंपन्यांनी नामंजूर विमा दाव्याप्रकरणी सुस्पष्ट कारणमिमांसा संबंधित शेतकऱ्यांना कटाक्षाने मराठी भाषेतच कळविणे व त्याची प्रत स्वतंत्र आदेशाद्वारे विभागनिहाय नियुक्त करण्यात आलेली विमा सल्लागार कंपनी / आयुक्त (कृषि) / संबंधित विभागीय कृषि सहसंचालक / जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / तालुका कृषि अधिकारी यांच्याकडे पाठविणे अनिवार्य आहे.

७. नियुक्त करण्यात येणाऱ्या विमा सल्लागार कंपनीने त्यांच्याकडे प्राप्त होणारे प्रस्ताव व्यवस्थितरीत्या / पूर्णतः तपासावेत व परिपूर्ण प्रस्ताव संबंधित विमा कंपनीकडे मान्यतेसाठी सादर करावेत. विमा सल्लागार कंपनीने विमा कंपनीकडे पाठविलेले प्रस्ताव मंजूर करुन घेण्याची संपूर्ण जबाबदारी विमा सल्लागार कंपनीची राहील. विमा दावा विमा कंपनीकडे सादर

झाल्यापासून त्यावर ६० दिवसांच्या आत कार्यवाही करणे विमा कंपनीवर बंधनकारक राहील. मात्र तरीही विमा कंपनीने प्रस्ताव नाकारल्यास, आवश्यक कागदपत्रांची पूर्तता झालेल्या प्रकरणी संबंधितांनी विमा सल्लागार कंपनीशी संपर्क साधल्यास, विमा सल्लागार कंपनीने शेतकऱ्यांच्यावतीने इर्डा ग्राहक तक्रार कक्ष / विमा न्यायाधीश / जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच / राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग /न्यायालय येथे दावे दाखल करणे आवश्यक राहील. अशा प्रकरणी येणाऱ्या खर्चाची प्रतिपूर्ती शासनाकडून अथवा शेतकऱ्यांकडून/ दावेदारांकडून करण्यात येणार नाही.

८. विमा सल्लागार कंपन्यांनी जिल्ह्यातील प्रलंबित प्रकरणांची यादी व मासिक प्रगती अहवाल आयुक्त (कृषि) / विभागीय कृषि सहसंचालक / संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / तालुका कृषि अधिकारी यांचेकडे दरमहा पाठवावा. **अपुऱ्या कागदपत्रांमुळे प्रलंबित राहिलेल्या / नाकारलेल्या प्रस्तावांप्रकरणी कागदपत्रांची पूर्तता करण्याची जबाबदारी विभागीय कृषि सहसंचालक / जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / तालुका कृषि अधिकारी यांची राहील. त्यांनी त्यांची जबाबदारी व्यवस्थितरित्या पार पाडली नाही तर त्यांना वैयक्तिकरित्या जबाबदार धरण्यात येईल.**

९. सन २०१४-१५ मध्ये शेतकरी जनता अपघात विमा योजनेसंबंधी शासनाचे वतीने आयुक्त कृषि तसेच स्वतंत्र आदेशाद्वारे नियुक्त करण्यात आलेल्या विमा सल्लागार कंपन्या व प्रस्तुत आदेशान्वये नियुक्त करण्यात आलेल्या विमा कंपन्या यांचेमध्ये प्रस्तुत शासन निर्णयातील अटी/शर्ती व मान्यतेनुसार सामंजस्य करार (MOU) व त्रिपक्षीय करार (Tripartite Agreement) करुन त्यानुसार योजना अंमलात आणली जाईल. **सदर सामंजस्य करारावर व त्रिपक्षीय करारावर स्वाक्षरी केल्यानंतरच विमा कंपन्यांना धनादेश अदा करण्यात यावेत.** शासन व विमा कंपन्यांमध्ये झालेल्या पॉलिसी करारातील तरतूदी, उपरोक्त दि.४ डिसेंबर,२००९ च्या शासन निर्णयाद्वारे व उपरोक्त दि.५ मार्च,२०११ च्या शासन शुध्दीपत्रान्वये विहित केलेल्या अटी व शर्ती तसेच भविष्यात लागू करण्यात येणाऱ्या अटी व शर्ती तसेच मार्गदर्शक सुचनांनुसार विमा दावे मंजूर करणे तसेच विमा प्रस्तावांसंदर्भातील कार्यपध्दती, सादर करावयाच्या आवश्यक कागदपत्रांबाबतचा तपशिल व नमुने इ. बाबी विमा कंपन्यांवर बंधनकारक राहतील.

१०. यावरील खर्च "मागणी क्रमांक डी-३, २४०१-पीक संवर्धन, ११०- पीक विमा, (००) (०६) शेतकऱ्यांसाठी वैयक्तिक अपघात विमा योजना (२४०१ ४४२७), राज्य योजना, ३३- अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ करिता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

११. प्रस्तुत प्रयोजनासाठी श्री.प्र.ल.गोसावी, उप सचिव , कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई-३२ यांना नियंत्रक अधिकारी तसेच श्री. वि.द.ठाकूर, अवर सचिव,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई-३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम कोषागारातून काढून रेखांकित धनादेश/दर्शनी धनाकर्षाव्दारे परिच्छेद क्र.२ येथील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे विमा कंपन्यांना अदा करण्यात यावी.

१२. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र.२६६/१४३१, दि.१४.१०.२०१४ व क्र.३२०/२०१४/व्यय-१, दि.३०.१०.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(श.बा.पावसकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
३) अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
९) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा ), मुंबई.
११) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
१२) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा ), नागपूर

१३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
१४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१७) टाटा अेआयजी जनरल इन्शुरन्स कंपनी लि.अे ५०१, पाचवा मजला, इमारत क्र.४, इन्फीनिटी पार्क, दिडोंशी, मालाड (पुर्व) मुंबई
१८) लिबर्टी व्हिडिओकॉन जनरल इन्शुरन्स कंपनी लि. सिटी टॉवर, ऑफिस नं.६०१/६०२, ६ वा मजला, बोट क्लब रोड, बंडगार्डन, पुणे ०१
१९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती ) प्रसिध्दीच्या विनंतीसह
२०) ग्रंथालय प्रमुख, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती)
२१) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
२२) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२३) सर्व जिल्हाधिकारी
२४) सर्व तहसिलदार
२५) सर्व कृषि संचालक
२६) सर्व विभागीय कृषि सह संचालक
२७) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
२८) सर्व तालुका कृषि अधिकारी
२९) सर्व उपसचिव /अवर सचिव / कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३०) सर्व मंत्रालयीन विभाग
३१) सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्ष यांची मध्यवर्ती कार्यालये
३२) निवड नस्ती, कार्यासन ११-अे